इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारित आकृतिबंधामध्ये सुधारणा करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.०८/आस्थापना-२**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- २२ मार्च, २०२२.**

वाचा:- १.शासन निर्णय, वि.जा.भ.ज.इमाव. व विमाप्र कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०१८/ प्र.क्र.८०/आस्था. दि. १३/८/२०१८
२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक : आस्थाप्र-२०१७/ प्र.क्र. ०८/आस्थापना-२, दिनांक १४/१/२०२१
३.वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.७४/२१/आपुक, दि.५/१/२०२२ सोबतचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६/११/२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील ८०८ पदांच्या सुधारित आकृतिबंधास संदर्भाधिन क्र. (२) येथील दि. १४/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर आकृतिबंधामधील क्षेत्रिय कार्यालयांतील ‘सहायक संचालक’ व ‘समाजकल्याण निरिक्षक’ या पदांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करणे तसेच या विभागाच्या संदर्भाधिन क्र.(१) येथील दि.१३.०८.२०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्माण केलेल्या ‘प्रकल्प अधिकारी’ संवर्गातील १३ प्रकल्प अधिकारी पदे सुधारीत आकृतिबंधामध्ये समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या संदर्भाधिन क्र.(२) येथील दि. १४/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या या विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील सुधारित आकृतिबंधामध्ये “सहाय्यक संचालक” हे (विजाभज वर्ग-२) (रु.९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४६००) असे पद मंजूर केले आहे. सदर पद जिल्हास्तरावरील प्रमुख पद असल्यामुळे “सहाय्यक संचालक” या पदाची वेतनसंरचना वर्ग-१ वेतनसंरचना (रु.९३००-३४८०० + ग्रेड वेतन ५०००) (एस-१८- ४९१००-१५५८००) मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच, आकृतीबंधामध्ये “समाज कल्याण निरिक्षक” हे (वेतनश्रेणी रु.५२००-२०२०० + ग्रेड पे २८००/-) चे पद मंजूर केले आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामध्ये या पदास (वेतनश्रेणी रु.५२००-२०२०० + ग्रेड पे ४२००/-) (एस-१३- ३५४००-११२४००) ही वेतनसंरचना लागू आहे. “समाज कल्याण निरिक्षक” संवर्गातील पदे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून वर्ग होणार असल्यामुळे “समाज कल्याण निरिक्षक” पदाची वेतनसंरचना (रु.५२००-२०२००+ग्रेड पे रु.४२००/-) (एस-१३- ३५४०० - ११२४००) सुधारीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२४.०१.२०१८ च्या बैठकीत मान्यता दिलेल्या व संदर्भाधिन क्र. (१) येथील दि.१३.०८.२०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्माण केलेल्या 'प्रकल्प अधिकारी' संवर्गातील १३ पदांचा समावेश आकृतीबंधामध्ये करण्याचे राहून गेले होते. सदर १३ 'प्रकल्प अधिकारी' पदे आकृतीबंधामध्ये समाविष्ट करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६.११.२०२१ रोजीच्या बैठकीतील मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग, आकृतिबंध पुनर्रचना कक्ष कार्यासनाच्या आनौपचारीक संदर्भ क्र. ५८/आपुक, दि.२२/३/२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२३११२९४५४९३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HENDRE SHRINATH VASANT

Digitally signed by HENDRE SHRINATH VASANT
DN: CN = HENDRE SHRINATH VASANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2022.03.23 11:31:25 +05'30'

**( श्रीनाथ व. हेंद्रे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव यांचे सह/उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
११. सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-१४/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
१३. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१४), मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (आस्था-२)